अतिवृष्टी/गारपीट/अवेळी पाऊस इ. मुळे पडझड झालेल्या घरांच्या दुरुस्ती/पुनर्बांधणीसाठी निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्र. एससीवाय-०८/२०१५/प्र.क्र.५४/ म-११**

मंत्रालय , मुंबई -४०० ०३२.

दिनांक : २० ऑगस्ट, २०१५.

वाचा :- १) शासन निर्णय क्र. एससीवाय-०८/२०१५/प्र.क्र.५४/म-११ दि. १७ एप्रिल, २०१५.

२) विभागीय आयुक्त, कोकण यांचे पत्र क्र.मशा/नैआ/२२४५/अनुदान मागणी दि. २१.७.२०१५.

३) विभागीय आयुक्त, नागपूर यांचे पत्र क्र. ससंले/अनु.मागणी/कावि-९७६/२०१५ दिनांक २ जुलै २०१५.

४) विभागीय आयुक्त, औरंगाबाद यांचे पत्र क्र. मशाका/का/१/टंचाई/प्र.क्र.१६ दिनांक २०.६.२०१५.

५) विभागीय आयुक्त, पुणे यांचे पत्र क्र. ससता/कावि/२८७ दिनांक २०.६.२०१५.

६) विभागीय आयुक्त, नाशिक यांचे पत्र क्र.लेखा/कक्ष/२३/२/नैआ/कावि/२७८७१ दिनांक २६.६.२०१५.

७) विभागीय आयुक्त, अमरावती यांचे पत्र क्र. उपआ/पुनर्व/उपले/कावि-३०७ दिनांक १३.७.२०१५.

**प्रस्तावना :-**

राज्यात वेळोवेळी झालेल्या अतिवृष्टी/गारपीट इ. बाबींमुळे विविध विभागात घरांची पडझड होवून नुकसान झाले. विभागीय आयुक्त यांच्या मागणीनुसार घरांची दुरुस्ती/पुनर्बांधणी यासाठी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

उपरोक्त विषयास अनुसरुन विभागीय आयुक्त यांना सोबतच्या विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे एकुण रु.१३५५.३९ लक्ष (अक्षरी रु. तेरा कोटी पंचावन्न लाख एकोणचाळीस हजार फक्त) इतक्या अनुदानाची रक्कम सुपुर्द करण्यात येत आहे.

२.	सदर खर्च "मागणी क्र.सी-६ २२४५-नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य (योजनेत्तर)" ०२ पूर, चक्रीवादळे इत्यादी, (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च (९१) (०१) घरांची दुरुस्ती/पुनर्बांधणी यासाठी सहाय्य, (२२४५०२७१) ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) या मुख्य लेखाशीर्षाखाली सन २०१५-१६ या चालू वित्तीय वर्षातून खर्ची टाकण्यात यावा

३.	सदर मदतीचे वाटप शासन विहित नैसर्गिक आपत्तीमध्ये मोडणा-या आपत्तींसाठी व आपत्ती निवारण निधीच्या निकषानुसार त्या त्या वेळी शासनाने घेतलेल्या निर्णयानुसार व त्या निर्णयामध्ये उधृत केलेल्या शासन निर्णयातील अटी/शर्ती व कार्यपध्दतीनुसार व निकषानुसार करण्यात यावे. या मदत वाटपाचे लेखे, अभिलेख/नोंदवह्या विहित कार्यपध्दतीनुसार अनुदान आहरीत व वितरीत करणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर अद्ययावत ठेवण्यात यावेत.

४.	खर्चावर पूर्ण नियंत्रण रहावे म्हणून नियंत्रक अधिकाऱ्यांनी (विभागीय आयुक्त) त्यांच्याकडे सुपुर्द करण्यात आलेले अनुदान पुर्णपणे जिल्हाधिकऱ्यांकडे वितरीत न करता ज्या जिल्हयाला निधीची आवश्यकता आहे अशा जिल्हयांना वितरीत करावे. जिल्हाधिकाऱ्यांना दिलेले अनुदान त्यांनी बऱ्याच अंशी प्रत्यक्ष खर्च केल्याशिवाय त्यांच्या जादा अनुदान मागणीचा विचार करु नये. तसेच शासनाकडे जादा अनुदानाची मागणी करण्यापूर्वी विभागीय आयुक्तांनी वितरीत केलेल्या अनुदानाचे पुनर्वाटप करावे. तसेच अधिक तरतूदीची मागणी करतांना संबंधित जिल्हाधिकाऱ्यांकडून मागणी केलेली संपूर्ण तरतूद खर्च होऊ शकेल, अशा तऱ्हेचे प्रमाणपत्र घ्यावे, तसेच अतिरिक्त लागणाऱ्या अनुदानासाठी खुलासेवार कारणे नमूद करावीत. त्याचप्रमाणे या विभागाला प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत आधीच्या महिन्यातील मासिक खर्चाचे विवरणपत्र न चुकता पाठवावे.

५.	नियंत्रक अधिकाऱ्यांनी अनुदान वाटपाची एक प्रत सचिव (मदत व पुनर्वसन) यांना न चुकता सादर करावी. आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी कोषागार /उपकोषागार यांजकडे पाठविण्यात येणाऱ्या बिलासोबत जोडल्या जाणाऱ्या कॉम्प्युटर स्लिपमध्ये गौण/उपशीर्षाच्या "संगणकयंत्र" संकेतांकाचा न चुकता उल्लेख करावा असे आदेश कृपया संबंधित अधिकाऱ्यांना नियंत्रण अधिकाऱ्यांनी द्यावेत. तसेच कोषागारातून/उपकोषागारातून आहरीत केलेल्या रकमेचा अहवाल शासनास सादर करावा.

६.	सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र.अनौस-३२२/२०१५ /व्यय-९, दि.१३.८.२०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८२४१५१४००७२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Chaaya Kiran Wadte

Digitally signed by Chaaya Kiran Wadte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Chaaya Kiran Wadte
Date: 2015.08.24 15:17:24 +05'30'

<u>सोबत:प्रपत्र-अ</u>

**( छा.कि.वडते )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त (सर्व)

२) जिल्हाधिकारी (सर्व)

३) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)

४) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षण), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर. (प्रत्येकी ३ प्रती).

५) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य , मुंबई -४०० ०५१.

६) अधिदान व लेखाधिकारी, बांद्रे (पुर्व), महाराष्ट्र -४०० ०५१.

७) निवासी लेखाधिकारी, मुंबई.

८) सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक शाखा, नवीन प्रशासकीय भवन, ५ वा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई ४०० ०३२ (२ प्रती)

९) वित्त विभाग (अर्थसंकल्प-४/व्यय-९/अर्थोपाय कक्ष), मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.

१०) कार्यासन अधिकारी (ब-१/ म-३/ म-७/ पीएसी/ पीएसी-१ कार्यासने), महसूल व वन विभाग, मंत्रालय , मुंबई-४०० ०३२.

११) निवडनस्ती /म-११ कार्यासन.

## प्रपत्र-अ

महसूल व वन विभाग, शा.नि.क्र.एससीवाय-०८/२०१५/प्र.क्र.५४/म-११,दि. २०.८.२०१५ चे विभागीय आयुक्तांना वितरीत करावयाच्या निधीचे विवरणपत्र.

(रु. लाखात)

| अ. क्र. | उप प्रधानशिर्ष/उपशिर्ष/गौणशिर्ष/संगणक संकेतांक **मुख्य लेखाशिर्ष- मागणी क्र.सी-६, २२४५, नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य (योजनेत्तर)** | नियंत्रक अधिकारी | खर्च करण्यास मंजूरी देण्यात आलेले अनुदान |
|---|---|---|---|
| १. | ०२ पूर, चक्रीवादळे इत्यादी ११३, घरदुरुस्ती /पुनर्बांधणी यासाठी सहाय्य (९१) राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च (९१) (०१) घरांची दुरुस्ती/पुनर्बांधणी यासाठी सहाय्य (२२४५०२७१) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर) | वि.आ.नाशिक | ६१०.२० |
| | | वि.आ.पुणे | ९८.६९ |
| | | वि.आ.नागपूर | १७७.६० |
| | | वि.आ. औरंगाबाद | ५२.७५ |
| | | वि. आ.अमरावती | २२६.१५ |
| | | वि.आ. कोंकण. | १९०.०० |
| | | **एकूण** | १३५५.३९ |